**महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा २०१९ मधील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस प्राप्त "उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे" या संवर्गातील पदावर परिविक्षाधीन उमेदवारांना पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश क्र :- आस्थाप-२०२३/ प्र.क्र.३६४/१/जल-२**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २६ जुलै, २०२४

**संदर्भ :** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. ३७४(१)/स्थापत्य/२०१९/१९, दि.१५.०६.२०२२
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१६७/१६-अ, दि.२१.११.२०२२
५) मा.उच्च न्यायालयात दाखल रिट याचिका क्र.२७२२/२०२३ संलग्नित अंतरिम अर्ज क्र.१४३२३/२०२३ संदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि.२२.१२.२०२३ रोजीचे आदेश
६) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र.न्यायाप्र-२४३३/प्र.क्र.३२/१६-अ, दि.२२.१२.२०२३
७) मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२२/२७३/जल-२, दि.२९/१२/२०२३

**शासन आदेश-**

महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा २०१९ मधील, सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परीक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या दि.१५/०६/२०२२ च्या पत्रान्वये, "उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-"अ" व अन्य समकक्ष पदे" या संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस प्राप्त ८४ उमेदवारांपैकी, ईडब्लुएस प्रवर्गातून शिफारस झालेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यास संदर्भ क्र.५ व ६ अन्वये मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार संदर्भ क्र.७ नुसार एकूण ६ उमेदवारांना प्रशिक्षणाकरीता शासन मान्यतेने तात्पुरती नियुक्ती देण्यात आली होती. आता, सदर परिविक्षाधीन उमेदवारांपैकी प्रत्यक्ष रुजू झालेल्या व प्रशिक्षणास उपस्थित असलेल्या खालील तक्त्यात नमूद उमेदवारांची "उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-"अ" व अन्य समकक्ष पदे" या संवर्गातील पदावर (वेतनश्रेणी-S-२० (रू.५६१०० - १७७५००/-) सविस्तर पदस्थापना, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :

| अ. क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | नाव | जात प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २२/२०१९ | अक्षय अनिल चौधरी | ईडब्लुएस | ईडब्लुएस | पुणे | उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण उपविभाग, वाई जि.सातारा (रिक्त पदावर) |

| अ. क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | नाव | जात प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | ६३/२०१९ | सायली शंकर जाधव | ईडब्लुएस महिला | ईडब्लुएस महिला | छत्रपती संभाजीनगर | उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण उपविभाग, तुळजापूर जि.धाराशिव (रिक्त पदावर) |
| ३ | ६४/२०१९ | चेतना बाळासाहेब शिंदे | ईडब्लुएस महिला | ईडब्लुएस महिला | नागपूर | उपविभागीय जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (ल.पा.) उपविभाग, हिंगणा जि.नागपूर (रिक्त पदावर) |

२. उक्त नमूद अधिकाऱ्यांनी नवीन पदाचा कार्यभार तात्काळ स्विकारावा. सदर कार्यभार स्विकारण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा नियम (पदग्रहण अवधी, स्वियेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहील. पदभार स्विकारल्यानंतर आवश्यक अहवाल विहीत मार्गाने शासनास सादर करावा.

३. उक्त नमूद अधिकाऱ्यांचे वाल्मी, छत्रपती संभाजीनगर व यशदा, पुणे येथील प्रशिक्षण दि.०१/०१/२०२४ ते दि.२७/५/२०२४ पर्यंत घेण्यात आले. दि.२७/०५/२०२४ नंतर सदर उमेदवार हे नियुक्तीच्या प्रतिक्षेत होते. सदर उमेदवारांना प्रशिक्षणानंतर सविस्तर पदस्थापना देण्यास प्रशासकीय कारणास्तव विलंब झालेला असल्याने, त्यांना दि.२८/०५/२०२४ ते या आदेशान्वये पदस्थापना केलेल्या पदावर प्रत्यक्ष रुजू होईपर्यंतचा कालावधी ( पदग्रहण अवधीच्या मर्यादेत ) सक्तीचा प्रतिक्षा कालावधी म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

४. सदर उमेदवारांनी विशिष्ट ठिकाणी सविस्तर पदस्थापना मिळविण्यासाठी खासदार/आमदार/लोकप्रतिनिधी/खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवाराविरूद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२४०७२६१८१५४३९८२६ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.07.26 18:31:00 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
३. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, महाराष्ट्र राज्य
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

५. अप्पर मुख्य सचिव (सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, (मृद व जलसंधारण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. अपर मुख्य सचिव (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८. आयुक्त, मृद व जलसंधारण, वाल्मी, छत्रपती संभाजीनगर.
९. सर्व विभागीय आयुक्त पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती/ छत्रपती संभाजीनगर.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य
११. अपर आयुक्त जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र,पुणे/नागपूर
१२. महासंचालक, वाल्मी, छत्रपती संभाजीनगर
१३. सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, पुणे/ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती/ छत्रपती संभाजीनगर.
१४. सर्व प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, पुणे/नागपूर/ छत्रपती संभाजीनगर.
१५. सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१६. सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग,
१७. सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण उपविभाग
१८. सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) उपविभाग
१९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
२०. सर्व संबंधित उमेदवारांना ईमेलव्दारे व्दारे
२१. सर्व कार्यासने (मृद व जलसंधारण विभाग)
२२. निवड नस्ती